सन २०२२-२३ मध्ये डॉ.पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजनेकरीता निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: तंशिपू-३३२३/प्र.क्र.२५/२३/तांशि-३**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२,**
**दिनांक: २८ मार्च, २०२३.**

वाचा: -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४/०४/२०२२.
२) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र.१८/तंशिस/डॉपदेवनिभ/खप्रमा/२०२२-२३/०७, दि.१७/०१/२०२३.
३) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक:तंनिवि-१५२३/प्र.क्र.१४/२३/तांशि-३, दि.२७/०१/२०२३.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०८/०२/२०२३.
५) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र.१८/तंशिस/डॉपदेवनिभ/खप्रमा/२०२२-२३/३८, दि.१४/०२/२०२३.
६) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक:तंनिवि-१५२३/प्र.क्र.१४/२३/तांशि-३, दि.२१/०२/२०२३.
७) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र.१८/अर्थसं/डॉपदेवनिभ/खप्रमा/२०२२-२३/७३, दि.०९/०३/२०२३.
८) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१६/०३/२०२३.

**शासन निर्णय**:-

डॉ.पंजाबराव देशमुख वसतीगृह निर्वाह भत्ता योजनेंतर्गत शैक्षणिक वर्ष २०१९-२०, २०२०-२१, २०२१-२२ मधील प्रलंबित व २०२२-२३ मध्ये पात्र ठरलेल्या विद्यार्थ्यांना वसतीगृह निर्वाह भत्त्याची रक्कम अदा करण्यासाठी सदर योजनेसाठी चालू वर्षी मुळ अर्थसंकल्पितपैकी अवितरीत असलेला रु.४.०० कोटी व पुरवणी मागणीव्दारे अर्थसंकल्पित झालेला रु.१५.९४ कोटी असा एकूण रु.१९.९४ कोटी इतका निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव संचालक, तंत्रशिक्षण यांनी संदर्भाधीन दि.०९/०३/२०२३ च्या पत्रान्वये सादर केला आहे. त्यास अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

"डॉ.पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना" या योजनेंतर्गत शैक्षणिक वर्ष २०१९-२०, २०२०-२१, २०२१-२२ मधील प्रलंबित व २०२२-२३ मध्ये पात्र ठरलेल्या विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष वास्तव्याच्या कालावधीप्रमाणे परिगणना केल्यानुसार वसतीगृह निर्वाह भत्त्याची रक्कम अदा करण्यासाठी चालू वर्षी सुधारित अंदाजामध्ये मंजूर झालेल्या रु.९५.९४ कोटी निधीपैकी उर्वरित रु.१९,९४,००,०००/- (अक्षरी रुपये एकोणीस कोटी चौऱ्यान्नव लक्ष फक्त) इतका निधी संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांना "खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून" आहरित व वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

(रुपये कोटीत)

| उद्दिष्ट | सुधारित अंदाजामध्ये मंजूर निधी | चालू वर्षी वितरीत केलेला निधी | अवितरीत निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| ३४, शिष्यवृत्ती/विद्यावेतने | ९५.९४ | ७६.०० | १९.९४ | १९.९४ |

**अटी व शर्ती:-**

१) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.टीईएम-२०१५/प्र.क्र.५०१/तांशि-४, दि.१३ ऑक्टोबर, २०१६ व या संदर्भातील त्यानंतरच्या दि.७ ऑक्टोबर, २०१७, दि.२२ फेब्रुवारी, २०१८, दि.१८ जून, २०१८ व इतर आदेशामध्ये नमूद अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

२) उपलब्ध तरतूद महाडिबीटी पोर्टलवरुन पात्र विद्यार्थ्यांना विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन वितरीत करण्यात यावी.

३) चूकीची अथवा खोटी माहिती भरुन शासनाकडून वसतीगृह निर्वाह भत्ता प्राप्त करुन घेतले असल्याचे निदर्शनास आले असल्यास, अशी रक्कम वसूल करुन ती शासन जमा करण्यात यावी.

४) सदरहू निधीचे तात्काळ वाटप करावे व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

३. सदर योजनेकरीता होणारा खर्च "मागणी क्र.डब्ल्यू-३, मुख्य लेखाशिर्ष २२०३-तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण १०७, शिष्यवृत्ती (००), (००)(०९) डॉ.पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना, (कार्यक्रम) (२२०३ ३५४२) ३४, शिष्यवृत्ती/विद्यावेतने" या लेखाशिर्षाखाली खर्ची दर्शविण्यात यावा व तो चालू आर्थिक वर्षात मंजूर झालेल्या निधीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१२०/१४७१, दि.१७/०३/२०२३ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३५८/२०२३/व्यय-५, दि.२३/०३/२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा सांकेतांक २०२३०३२८१३०५३५४००८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANALI MILIND SAMANT

Digitally signed by MANALI MILIND SAMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=e4e402a7e3426729716afaf506c8f4a9d1528c744234b2ca1302837eaee0ebdd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C63B0A0419F0EB37099DACA08E4CCCCE3BF49154BF43E8881E68AC2CA3A46392, cn=MANALI MILIND SAMANT
Date: 2023.03.28 18:32:36 +05'30'

(मनाली सामंत)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) सहसंचालक, सर्व तंत्रशिक्षण विभागीय कार्यालये. (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, बृहन्मुंबई.
७) नियोजन विभाग/वित्त विभाग, व्यय-५/अर्थसंकल्प-८, मंत्रालय, मुंबई.
८) कक्ष अधिकारी/तांशि-४, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) कक्ष अधिकारी/साशि-१, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती/तांशि-३.